**उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत कार्यालये, अकृषी विद्यापीठे, शैक्षणिक संस्था येथे मान्यवर व्यक्ती आणि अधिकारी यांच्या भेटी किंवा समारंभाच्यावेळी त्यांचे स्वागत पुष्पगुच्छ देऊन करण्याऐवजी पुस्तक देऊन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण -१११११/(प्र.क्र.१४६/१५)/समन्वय**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १५ ऑक्टोबर, २०१५.

**<u>शासन परिपत्रक -</u>**

उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत कार्यालये, अकृषी विद्यापीठे, शैक्षणिक संस्था, महाविद्यालये येथे मान्यवर व्यक्ती/अधिकारी व इतर संबंधीत इत्यादी कामकाजाच्या निमित्ताने भेटी देत असतात. क्षेत्रीय कार्यालयांना भेटी देणाऱ्या मान्यवर व्यक्ती आणि अधिकारी यांचे सर्वसाधारणपणे पुष्पगुच्छ देऊन स्वागत केले जाते. डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांच्या स्मृती जतन करण्याच्या अनुषंगाने त्यांचा दि.१५ ऑक्टोबर हा जन्मदिन, " वाचन प्रेरणा दिवस " म्हणून साजरा करण्यात येणार आहे. त्या पार्श्वभूमीवर एकूण वाचन संस्कृती व वाचन प्रेरणा वाढीस लागावी यासाठी उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत कार्यालये, अकृषी विद्यापीठे, शैक्षणिक संस्था येथे मान्यवर व्यक्ती आणि अधिकारी यांच्या भेटी किंवा समारंभाच्यावेळी त्यांचे स्वागत पुष्पगुच्छ देऊन करण्याऐवजी विविध विषयांवरील पुस्तके देऊन करण्यात यावे.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५१०१५१२३०११९२०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2015.10.15 17:20:11 +05'30'

**( का.रा.पिळणकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
१०. निवडनस्ती.